**महापे, नवी मुंबई येथील सायबर सुरक्षा प्रकल्पाच्या इमारतीची विद्युत, पाणी व देखभाल व दुरूस्तीची देयके व मालमत्ता करापोटी अदा करण्यासाठी एकूण रू. १,३७,८१, ३९८/- इतका निधी महाराष्ट्र राज्य सायबर कार्यालय, मुंबई यांना उपलब्ध करून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-०१२५ /प्र.क्र.४० /विशा-३(अ)**
मंत्रालय,मुंबई-४०००३२
दिनांक: २५ मार्च, २०२५

**संदर्भ :-**

१. पोलीस अधीक्षक, विशेष पोलीस महानिरीक्षक, म. रा. सायबर, मुंबई यांचे पत्र क्र.विपोमनि/ सायबर व मअप्र/ अनुदान मागणी/२०२५ /४७८, दि.०४.०२.२०२५

२. शासनाचे समक्रमांकाचे ज्ञापन, दि.११.०३.२०२५

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र सायबर सुरक्षा प्रकल्पासाठी, महापे, नवी मुंबई येथे घेण्यात आलेल्या इमारतीच्या माहे नोव्हेंबर ते मार्च सन २०२४-२०२५ या कालावधीतील रू. ८२,००,०००/- इतक्या रक्कमेची विद्युत व दूरध्वनी देयकापोटी निधी तसेच सदर इमारतीच्या मालमत्ता कर रक्कमेसाठी रू. ९७,८२,२९५/- इतका निधी लेखाशीर्ष (२०५५ A ०३२) मधील उद्दिष्ट १७-संगणक मधील निधीतून पूनर्वितरणाद्वारे उपलब्ध करून देण्याबाबत उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये पोलीस अधीक्षक, विशेष पोलीस महानिरीक्षक, म. रा. सायबर, मुंबई यांनी शासनास विनंती केली होती.

त्यानुषंगाने विद्युत व दूरध्वनी देयकापोटी रू. ७२,२६,७९०/- इतका निधी उद्दिष्ट ०६-दूरध्वनी, विदयुत आणि पाणी देयके या अंतर्गत तसेच सदर इमारतीच्या मालमत्ता करापोटी रू.६५,५४,६०८/-इतका निधी उद्दिष्ट १४-भाडेपट्टी व कर या अंतर्गत लेखाशीर्ष (२०५५ A ०३२) उद्दिष्ट १७-संगणक मधील निधीतून पूनर्वितरणाद्वारे अपर पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई यांना उपलब्ध करून देण्यास उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील ज्ञापनान्वये मान्यता दिली आहे.

आता महापे, नवी मुंबई येथील सायबर सुरक्षा प्रकल्पाच्या इमारतीची विद्युत, पाणी व देखभाल व दुरूस्तीची देयके व मालमत्ता कर अदा करण्यासाठी अपर पोलीस महासंचालक,

महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई यांना सदर निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई कार्यालयाला सायबर सुरक्षा प्रकल्पासाठी महापे, नवी मुंबई येथे घेण्यात आलेल्या इमारतीच्या विद्युत, पाणी , देखभाल व दुरूस्तीची खर्चाची देयके व मालमत्ता करापोटी देयके अदा करण्यासाठी लेखाशीर्ष (२०५५ A ०३२) उद्दिष्ट १७-संगणक खर्च या उद्दिष्टामधून उद्दिष्ट ०६-दुरध्वनी,विद्युत,पाणी व १४-भाडेपट्टी व कर या उद्दिष्टाखाली अनुक्रमे **रू. ७२,२६,७९०/- (अक्षरी रूपये बाहत्तर लाख सव्वीस हजार सातशे नव्वद फक्त)** व **रू. ६५,५४,६०८/- (अक्षरी रूपये पासष्ठ लाख चौपन हजार सहाशे आठ फक्त)** असे एकूण **रू.१,३७,८१, ३९८/- (अक्षरी रूपये एक कोटी सदतीस लाख एक्याऐंशी हजार तीनशे अठ्ठ्याण्णव फक्त)** इतका निधी उपलब्ध करून देण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च लेखाशीर्ष मागणी क्र.बी-०१, २०५५ -पोलीस (००) ११५ पोलीस दलाचे आधुनिकीकरण (०१) विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प (०१) (०१) तंत्रज्ञान विकास प्रकल्प, (२०५५ A ०३२) अंतर्गत उद्दिष्ट-०६ दुरध्वनी, विद्युत आणि पाणी व १४ - भाडेपट्टी व कर या उद्दिष्टातर्गत खर्ची टाकून तो सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. उपरोक्त निधी खर्च करतांना वित्त विभाग,शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/ अर्थ-३, दि.०१.०४.२०२४ नमूद करण्यात आलेल्या परिच्छेद ५ ते १९ मधील मार्गर्शक सूचना व परिशिष्टामधील मार्गदर्शक सूचनाचे काटेकोर पालन करावे व वेळोवेळी विहीत विवरणपत्रात उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे.

४. सदर निधी वितरणाचे आदेश नियोजन विभागाने अनौपचारीक संदर्भ क्र.७६/का १४६१, दि.१४.०२.२०२५ व वित्त विभागाने अनौपचारीक संदर्भ क्र.१६०/२०२५/व्यय-७, दि.०५.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर निधी आहरित करण्यासाठी अपर पोलीस महासंचालक (सायबर व म.अ.प्र.), महाराष्ट्र राज्य, मुंबई हे “नियंत्रण अधिकारी” तसेच त्यांच्या अधिनस्त कार्यालयाचे वरिष्ठ कार्यालय अधीक्षक/ प्रशासकीय अधिकारी (सायबर व म.अ.प्र.), महाराष्ट्र राज्य, मुंबई हे “आहरण व संवितरण अधिकारी” असतील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२५१६२९२८१०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SWAPNA NILESH DESHPANDE

Digitally signed by SWAPNA NILESH DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=8f33d110713d529fd14cadb7107a7a56252382926dfbbe68e0ce49aae150e1e8, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F68C2CBBE864D14D120F29960E8E60D5C00E2D614E6A0234A132D68EADBD05CC, cn=SWAPNA NILESH DESHPANDE
Date: 2025.03.25 16:30:17 +05'30'

**( स्वप्ना देशपांडे )**

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर पोलीस महासंलचाक,महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई.
२. सह सचिव (अर्थ-१), गृह विभाग मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. निवडनस्ती/विशा-३(अ), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.